**संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणाऱ्या स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत_.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बालगृ-२०१४/प्र.क्र.१४७/का-८,**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख: १९ जानेवारी, २०१५.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१४.क्र.प्र/६६-अर्थसंकल्प/३ दि.१७ एप्रिल,२०१४
२) शासन परिपत्रक, क्र-अंदाज.२०१४.क्र.प्र /११०-का /४, दि .१ जुलै, २०१४.
३) शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि. २ जानेवारी,२०१५.

**प्रस्तावना :-**

सन २०१४-२०१५ साठी निराश्रित अनाथ,बेघर इ. संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणा-या स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान देण्यासाठी (२२३५-३०४-१) योजनेतर योजना या लेखाशिर्षाखाली रु.१८,५७,१९,०००/- (अक्षरी रुपये अठरा कोटी सत्तावन्न लाख एकोणीस हजार फक्त) इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे. सदर निधीपैकी ६०% निधी वित्त विभागाच्या मान्यतेने बीडीएसवर वितरीत करण्यात आला आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०१४-२०१५ साठी निराश्रित बालक, संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणाऱ्या योजनेत्तर स्वयंसेवी संस्थांना वेतन व वेतनेत्तर सहाय्यक अनुदान देण्यासाठी (२२३५-३०४-१) या लेखाशिर्षाखाली ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) यासाठी रु.१८,५७,१९,०००/- (अक्षरी रुपये अठरा कोटी सत्तावन्न लाख एकोणीस हजार फक्त) इतका निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे. सदर निधीपैकी ६०% निधी रू.११,१४,३१,४००/- (अक्षरी अकरा कोटी चौदा लाख एकतीस हजार चारशे फक्त) वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. -एक्स.सदर रक्कम मागणी क्र१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०२, बालकल्याण, (०२) स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान )०२) (०३संगोपन व संरक्षणाची गरज ( ) असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणाऱ्या स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान२२३५-३०४-१ (३१

सहाय्यक अनुदान २०१४ सहाय्यक अनुदान वेतन या लेखाशिर्षाखाली सन ३६ व (वेतनेत्तर)-मध्ये १५ उपलब्धकरुन देण्यात आलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

३ . रू.११,१४,३१,४००/- (अक्षरी रुपये अकरा कोटी चौदा लाख एकतीस हजार चारशे फक्त) इतका निधी निराश्रित बालक, संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणा-या योजनेत्तर स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान देण्यासाठी या बाबींसाठी खर्च होईल व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे, याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी घ्यावी.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र/१०.८०/प्र.क्र.७०/२००८/विनिमय, दि.१५.५.२००९ भाग पहिला, उपविभाग-३ / परिच्छेद २७ (२) (ब) अन्वये विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा औपचारिक संदर्भ क्र.७५६/व्यय-६, दि. ०१.०१. २०१५अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२२०१०१६५९४९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasave Vijesing F

Digitally signed by Vasave Vijesing F
DN: CN = Vasave Vijesing F, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Women and Child Department
Reason: I am the author of this document
Date: 2015.01.23 18:38:09 +05'30'

**वि.फ.वसावे**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर.
वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
वित्त विभाग (व्यय-६), (अर्थसंकल्प-७), मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव, (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास विभाग, मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
महिला व बाल विकास विभागातील सर्व अधिकारी व कार्यासने.
निवड नस्ती/का-८